# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांक: एफएसटी-०९/२०/प्र.क्र.१२७/फ-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ ऑक्टोंबर, २०२०.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने वन विभागातील वनक्षेत्रपाल, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव व सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती श्वेता रंगनाथ आडे,व.प.अ. तथा तांत्रिक सहायक, वन्यजीव पश्चिम मुंबई | वनपरिक्षेत्र अधिकारी, मांडवी प्रादेशिक | श्रीमती आडे यांना सा.प्र.वि., अधिसूचना दि.२८.४.२०१५ मधील नियम १२ (अ) मधील तरतुदीनुसार कोकण-२ हा महसूली विभाग बदलून कोकण-१ हा महसूली विभाग देण्यात आला आहे. |
| २ | श्रीमती नम्रता दत्तात्रय पवार, वनपरिक्षेत्र अधिकारी (प्रादेशिक), मांडवी | वनपरिक्षेत्र अधिकारी, (जंकास) ठाणे निर्देशन विभाग | प्रशासकीय कारणास्तव |

२. सदर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

तसेच, संबंधित अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

३. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पुर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१३१५५७१४८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2020.10.13 15:59:18 +05'30'

**(अ. का. लक्कस)**
**कार्यासन अधिकारी,महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे
४. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
५. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
६. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
७. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
८. संबंधित वनपरिक्षेत्र अधिकारी यांना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यमसंवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे मार्फत.
९. निवड नस्ती (फ-४ कार्यासन).